# बेगम सुमरू यांचे शाही पर्यटन




श्री.मनोज दाणी यांनी सादर केलेल्या पानिपत पुस्तकातील चित्रांचा परिचय करून घेऊन मला त्यातील काही चित्रे तपशीलात जाऊन भावली. असेच हे चित्र मागील कव्हर स्टोरीचे आहे. पान ३४ -३५वर या चित्रातील तपशिलाचे वर्णन आहे. त्याशिवाय काही नोंदी सादर.

## Battle of Panipat

**बेगम सामरू** (Joanna Nobilis Sombre (ca 1753– 27 January 1836) किंवा सुमरु या साडे चार फुटी बुटक्या बाईंचे बडे प्रस्थ असले पाहिजे. त्या पर्यटनाला चालल्या असतानाचा लवाजमा, शाही थाट पाहून ऐश्वर्य, सत्ता आणि सौंदर्य यांचा त्रिवेणी संगम झाला असावा. हे सर्व मिळवायला, टिकवायला बरेच काही गमवावे लागते. ते विकीपीडिया वरून कळून येईल. असो.

समजून घ्यायला सोपे जाईल म्हणून चित्राचे ४ भाग सादर केले आहेत.

## १. पूर्ण चित्र.



## २. बेगम सुमरू यांचे शाही पर्यटन

सजवलेल्या हत्तीवर छत्रचामरे घेऊन आरूढ बेगम सुमरू, मागे ४ चार हत्तींचा ताफा, असा रस्त्यारील सोहळा कौतुकाने? पाहणारे पांढऱ्या रंगाचे कुत्रे, बेगम सामरूंना जाता जाता खायला वेचक शाही भोजन पदार्थ? कावडीतून नेणारा भोई...! रस्त्यावरून जाणाऱ्या इतर लोकांना हटकणारा शिपाई दिसतात.




## ३. हत्तीवरून शोभायात्रेची मिरवणूक किंवा संचलन.

विदेशी सैन्य पथकांचा रेखीवपणा, उंट, विविध प्रकारचे सुशोभित घोडे, रंगित ध्वज, तोफखाना पथके, घोषवाद्यांचे ताफे, पर्यटनाला लागणारे तंबू, मेणे, पालख्या, पाण्याची सोय, यावरून २६ जानेवारीच्या नवी दिल्लीतील संचलनाच्या आठवण व्हावी अशी शिस्तबद्धता उठून दिसते.




## ४. चार बैलांचा तोफगाडा




## ५. सहा बैलांचा तोफखाना पथक



या संदर्भात मी अधिक माहिती अमेरिकेत वास्तव्य करणाऱ्या मनोज दाणींशी बोलताना समजून घेतली.



Portrait of Begum Samru

बेगम सामरू वॉल्टर रेनहार्ट सॉमब्रे यांची ही आवडती नर्तिका नंतर पत्नी. काश्मिरी समुदायातील कॅथॉलिक धर्मात गेलेली नाचगाणी करणारी साडे चार फुट बुटबैंगण, (सप्रू, नेहरू या नावांशी साधर्म्य असल्याने ती पंडित असावी. (चित्रात तिच्या उजव्याहातातील लहानशी जपमाळ. तशीच तसबीह पाकिस्तानी पंतप्रधान इम्रानखान प्रेसिडेंट ट्रंपशी बोलत असताना हातात दिसत होती. कंस माझा.) तिला एक बेगम उमदा नावाची एकुलती मैत्रीण होती. (कदाचित ती नातलग किंवा पळवून आणताना काश्मीरातील गाववाली असावी.) स़ॉमब्रे वारले नंतर दुसऱ्या फ्रेंच ले व्हेसो सेनान्याशी १७९३ मधे सूत जमवून बेगम सामरू यांनी निकाह केल्याच्या

बातमीमुळे मेरठच्या आसपास संस्थानात उठाव झाला. ते दोघे रातोरात पळून गेले. पती मारला गेला हे ऐकून सामरूनी आत्महत्या केली. पण कर्मयोगाने वाचली व पुढे ८५ वर्षे जगून १८३६ मधे वारली. मरे पर्यंत तिने अमाप संपत्ती जमा केली होती. मेरठ जवळच्या सरधाना, गुरुग्राममधे वाडे, गढ्या तर दिल्लीत भगिरथ पॅलेस अशा अनेक मालमत्ता तिच्या नावाने आजही ओळखल्या जातात.

इंग्रजां विरुद्ध मराठे यांच्यातील अस्साये (महाराष्ट्रातील बोकरदन जवळ) ह्या गावाच्या आसपास १८०३ साली झालेल्या लढाईत तिच्या सैन्याने मराठ्यांच्या बाजूने लढा दिला होता असे म्हणतात..असो.

**गूगलमधील नकाशात जरी अस्साये लिहिले असले तरी असई हेच गावाचे नाव बरोबर आहे. नकाशातील असई हे कोल्हापुरच्या जवळचे आहे हे ते महालक्ष्मी मंदिर वाले कोल्हापुर नाही. पण गूगल नकाशाची झलक दाखवली. असो.**

**पानिपत पुस्तकातील बाकीची माहिती रंजक आहे... याशिवाय आणखी त्या पुस्तकातील रंगीत चित्रांचे रसग्रहण केले आहे. त्यातही मनोज दाणी मार्गदर्शन करत राहतील अशी अपेक्षा करतो.**




Begum Samru's Household

**बेगम सामरूचा गोतावळा**




भागिरथ पॅलेस चांदणी चौक दिल्ली, तिची मालमत्ता होती.

अशा मोठ्या लँड स्केप चित्रांतील दर्शवलेल्या घटना, व्यक्तींवर चित्रकाराने डोळेफोड करून घेतलेल्या कष्टांचे चीज व्हावे. बारीक निरीक्षणातून आपल्या कलेला पाहिले जावे अशा माफक इच्छा असेल तर ती यानिमित्ताने पूर्ण व्हायला मदत होईल.

अशाच काही पेंटिंग्जवर वेगळे लेखन करून बारकावे शोधायचा प्रयत्न करावा असे मनात आहे.

समाप्त